महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-अ (शिक्षण सक्षमीकरण शाखा) या संवर्गातील वरिष्ठ अधिव्याख्याता या पदावरील अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- पकास २४२३/प्र. क्र.७१/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ मे, २०२३

वाचा :- १. शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र. ससेप्र-४४१६/ प्र.क्र.३०१/१६/ प्रशा-२, दिनांक २७.०३.२०१७
२. सामान्य प्रशासन विभाग शा.नि.क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ,दिनांक २९.०२.२०१६.
३. सामान्य प्रशासन विभाग शा.नि.क्र. परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ,दिनांक २२.०६.२०२१
४. शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र. पकास-२४२१/प्र.क्र.१४६/प्रशा-२, दिनांक ०५.०४.२०२२

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा येथे नमूद अ.क्र.१ येथील दिनांक २७.०३.२०१७ च्या शासन निर्णयान्वये सरळसेवेने महाराष्ट्र लोकसेवा आयोग पुरस्कृत उमेदवारांची महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा ) गट-अ संवर्गातील वरिष्ठ अधिव्याख्याता या पदावर २ वर्षाच्या परिविक्षाधीन कालावधीसाठी नियुक्ती करण्यात आली आहे. सदर नियुक्ती देण्यात आलेल्या काही अधिकाऱ्यांच्या शिफारशी व नियुक्तीवर श्री. राहुल बर्वे यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे मूळ अर्ज क्र. १२०९/२०१६ दाखल केला होता. यास्तव, सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २२.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मूळ अर्ज क्र. १२०९/२०१६ मध्ये प्रतिवादी असलेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी मूळ अर्ज क्र.१२०९/२०१६ च्य अंतीम निर्णयापर्यंत वाढविण्यात आला आहे.

२. मा . महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांच्या दिनांक २४.०२.२०२३ रोजीच्या शादेशान्वये मूळ अर्ज क्र.१२०९/२०१६ निकाली काढला असून प्रतिवादी असलेल्या अधिकाऱ्यांच्या नियुक्तीबाबत मा. न्यायाधिकरणाने कोणतीही प्रतिकुल शेरे दिलेले नाहीत. सबब त्यांचा परिविक्षाधीन कालावधी नियमित स्वरुपात पूर्ण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सदर बाबीसंदर्भात शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

शासनाच्या प्रचलित धोरणानुसार परिविक्षाधीन कालावधीच्या अटींची पूर्तता करणाऱ्या, उपरोक्त वाचा येथे नमूद दिनांक २७.०३.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र शिक्षण सेवा (शिक्षण सक्षमीकरण शाखा) गट-अ संवर्गात वरिष्ठ अधिव्याख्याता या पदावर अधिकारी यांचा त्यांच्या नावासमोर रकाना क्रमांक ७ मध्ये नमूद दिनांकास परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यात येत

असून रकाना क्रमांक ८ मध्ये नमूद दिनांकास त्यांची सेवा पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ क्र | अधिकाऱ्यांचे नांव | शासन सेवेत नियुक्तीच्या आदेशाचा दिनांक | शासन सेवेत प्रथम रुजू झाल्याचा दिनांक | रकाना ४ मधील दिनांकानुसार परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत घेतलेल्या एकूण अर्जित/परिवर्तीत रजा इ. एकूण कालावधी | रकाना ६ मधील कारणांमुळे वाढलेला परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक पूर्ण केल्यामुळे शासन सेवा ज्या दिनांकापासून पुढे चालु ठेवावयाची आहे तो दिनांक. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री रवि लक्ष्मण जाधव, | शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र.ससेप्र-४४१६/ प्र.क्र.३०१/१६/ प्रशा-२, दिनांक २७.०३.२०१७ | ३०.०३.२०१७ | २९.०३.२०१९ | निरंक | २९.०३.२०१९ | ३०.०३.२०१९ |
| २ | श्री. गंगाधर विठोबा वाळले | शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र.ससेप्र-४४१६/ प्र.क्र.३०१/१६/ प्रशा-२, दिनांक २७.०३.२०१७ | ०१.०४.२०१७ | ३१.०३.२०१९ | निरंक | ३१.०३.२०१९ | ०१.०४.२०१९ |
| ३ | श्री. श्रीकिशन युवराज देशमुख | शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र.ससेप्र-४४१६/ प्र.क्र.३०१/१६/ प्रशा-२, दिनांक २७.०३.२०१७ | ०१.०४.२०१७ | ३१.०३.२०१९ | १० | १०.०४.२०१९ | ११.०४.२०१९ |

| अ क्र | अधिकाऱ्यांचे नांव | शासन सेवेत नियुक्तीच्या आदेशाचा दिनांक | शासन सेवेत प्रथम रुजू झाल्याचा दिनांक | रकाना ४ मधील दिनांकानुसार परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षा कालावधीत घेतलेल्या एकूण अर्जित/परिवर्तीत रजा इ. एकूण कालावधी | रकाना ६ मधील कारणांमुळे वाढलेला परिविक्षाधीन कालावधी पूर्ण होण्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाधानकारक पूर्ण केल्यामुळे शासन सेवा ज्या दिनांकापासून पुढे चालु ठेवावयाची आहे तो दिनांक. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | श्री. मंगेश भगवान घोगरे | शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र. ससेप्र-४४१६/ प्र.क्र.३०१/१६/ प्रशा-२, दिनांक २७.०३.२०१७ | ०७.०४.२०१७ | ०६.०४.२०१७ | निरंक | ०६.०४.२०१९ | ०७.०४.२०१९ |
| ५ | श्री. सागर बाबुराव तुपे | शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र. ससेप्र-४४१६/ प्र.क्र.३०१/१६/ प्रशा-२, दिनांक २७.०३.२०१७ | ११.०४.२०१७ | १०.०४.२०१९ | निरंक | १०.०४.२०१९ | ११.०४.२०१९ |
| ६ | श्री. विजयकुमार सोपानराव सायगुंडे | शा.शि.व क्री.वि. शा.नि. क्र. ससेप्र-४४१६/ प्र.क्र.३०१/१६/ प्रशा-२, दिनांक २७.०३.२०१७ | ०६.०४.२०१७ | ०५.०४.२०१९ | निरंक | ०५.०४.२०१९ | ०६.०४.२०१९ |

२. परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करणाऱ्या अधिकाऱ्यांना वार्षिक वेतनवाढी देण्यात याव्यात. तसेच संबंधितांच्या सेवापुस्तकात याची नोंद घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०५१७१५२१०६३८२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY NIVRUTTI BHOSALE

Digitally signed by VIJAY NIVRUTTI BHOSALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION ND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=c7a4e31cd0e0c9eec89f89869f2dd675d71f0636b0a2ea82e485826669926889, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7966FB8DA6E03C3F79409670C65FAC077378A68F734A11D051D02DC3119DC128, cn=VIJAY NIVRUTTI BHOSALE
Date: 2023.05.17 15:22:23 +05'30'

**( विजय भोसले )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)
३) सर्व शिक्षण संचालक
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
५) प्राचार्य, सर्व जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७) संबंधित अधिकारी (आयुक्त शिक्षण यांचे कार्यालया मार्फत)
८) निवड नस्ती.